सन २०१८-१९ मध्ये प्रादेशिक विद्या प्राधिकरण (राज्य विज्ञान व गणित शिक्षण संस्था), नागपूर यांना निधी वितरित करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,
शासन निर्णय क्रमांक : निधिवि-२०१८/प्र.क्र.८२/प्रशिक्षण
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ३.८.२०१८

वाचा :

वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, महाराष्ट्र विनियोजन अधिनियम, २०१८ निधी वितरण, दि.२.४.२०१८

शासन निर्णय:-

प्रादेशिक विद्या प्राधिकरण (राज्य विज्ञान व गणित शिक्षण संस्था), नागपूर मार्फत सुरू असलेल्या विज्ञान व गणित विषयक अनेक कार्यक्रमांची अंमलबजावणी करण्यासाठी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता रू.५० लक्ष इतकी तरतूद करण्यात आलेली आहे. वित्त विभागाचे दि.२.४.२०१८ रोजीचे परिपत्रक महाराष्ट्र विनियोजन अधिनियम, २०१८ निधी वितरण, मधील परिच्छेद क्र.४ नुसार ७०% निधी विभाग स्तरावर वितरित करण्यास मान्यता दिलेली आहे. त्यानुसार रू.५० लक्षच्या ७०% म्हणजेच रू.३५ लक्ष इतका निधी प्रादेशिक विद्या प्राधिकरण (राज्य विज्ञान व गणित शिक्षण संस्था), नागपूर यांना वितरित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च "मागणी क्रमांक ई-२, २२०२- सर्वसाधारण शिक्षण- (०१) प्राथमिक शिक्षण, (०२)(०६) राज्य विज्ञान संस्थांना त्या चालवित असलेल्या अनेक कार्यक्रमांची अंमलबजावणी करण्यासाठी सहाय्य (२२०२H८६६) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात उपलब्ध करण्यात आलेल्या तरतुदीतून करण्यात यावा. यासाठी आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी व संचालक, प्रादेशिक विद्या प्राधिकरण (राज्य विज्ञान संस्था), नागपूर यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, ज्या

उद्दिष्टांसाठी सदर निधी मंजूर करण्यात आला आहे त्याच उद्दिष्टांसाठी खर्च करावा व त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्यात यावे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दि.२.४.२०१८ च्या परिपत्रकान्वये विभागास असेलल्या निधी वितरणाच्या अधिकाराच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०८०४१७१७१८६६२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Baban Ranganath Mali

Digitally signed by Baban Ranganath Mali
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Departrment, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=058a3365edca1bab7b5a512fa9b602a739d12b55819b89fd7154a7a28ccbaa1e, serialNumber=d2974b67a90018e618d5e11ffd00382f063542cc3d866753cfd5a4ad652b1908, cn=Baban Ranganath Mali
Date: 2018.08.04 17:19:35 +05'30'

**( बी.आर.माळी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग.
२. आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. शिक्षण संचालक (माध्यामिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद (विद्या प्राधिकरण), पुणे.
६. संचालक, प्रादेशिक विद्या प्राधिकरण (राज्य विज्ञान व गणित शिक्षण संस्था), नागपूर
७. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी मंजूर रक्कम बी.डी.एस. प्रणालीवर तात्काळ उपलब्ध करून द्यावी.
८. कार्यासन प्रशिक्षण, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय (निवड नस्ती).